**कोराडी औष्णिक व विद्युत प्रकल्प संच क्र.६ च्या नूतनीकरणास व आधुनिकीकरणासाठी महानिर्मिती कंपनी मर्यादित यांना प्राप्त झालेल्या अनुदानाच्या रकमेच्या समायोजना बाबत (वित्तीय वर्ष २०१६-१७)**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. समायोजन-२०१६/प्र.क्र.९९(२)/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक ३१ मार्च, २०१७

**वाचावे** :- महालेखाकार कार्यालयाचे पत्र D.O.ACII/CAORB/CH-१/२०१५-१६/३३५ दिनांक २२/०७/२०१६

**प्रस्तावना :-**

कोराडी औष्णिक विद्युत प्रकल्प संच क्र.६ नूतनीकरण व आधुनिकीकरण प्रकल्प जागतिक बँकेच्या सहकार्याने उभारण्यात येत आहे. सदर प्रकल्पासाठी सन २०१६-१७ या वर्षाकरिता अनुदान म्हणून रु.४९.२६ कोटी इतकी तरतूद करण्यात आलेली आहे. जागतिक बँकेकडून सन २०१६-१७ मध्ये अनुदान स्वरुपात रु.९८,६८,६११/- राज्य शासनाच्या खात्यात जमा झालेली आहे राज्य शासनाच्या खात्यात जमा झालेली सदर रक्कम पुस्तकी समायोजनाने योग्य त्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महानिर्मिती कंपनीच्या कोराडी युनिट क्र.६ ( नूतनीकरण व आधुनिकीकरण) प्रकल्पास केंद्र शासनाच्या पुढाकाराने जागतिक बँकेकडून मंजूर झालेलया अनुदानापैकी सन २०१६-१७ मध्ये राज्य शासनाच्या खात्यात जमा झालेली रक्कम रु.९८,६८,६११/- (रुपये अठ्ठ्याण्णव लाख अडुसष्ठ हजार सहाशे अकरा फक्त) इतकी रक्कम समायोजनाने वितरीत करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे,त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

३. वरील बाबींचा खर्च "मागणी क्रमांक के-०६, २८०१ वीज,०५,पारेषण व वितरण, १९९ अशासकीय संस्थाना सहाय्य, (००), (००)(०१) एमएसपीजीसीएल ला कोराडी औष्णिक विद्युत प्रकल्प संच क्रमांक ६ च्या नुतनीकरणासाठी व आधुनिकीकरणासाठी सहाय्य (२८०१२८७६) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकावा व तो सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधुन भागविण्यात यावा.

४. वरील मंजूर करण्यात आलेली अनुदानाची रक्कम महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादीत याना रोखीने न देता पुढे दर्शविल्याप्रमाणे महानिर्मिती कंपनीकडून शासनास येणे असलेल्या रकमेपोटी वसूल करण्यात यावी, आणि खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली समायोजनाद्वारे जमा करण्यात यावी.

| अ.क्र. | तपशील | रक्कम रुपये | जमा लेखाशीर्ष |
|---|---|---|---|
| १ | वित्तीय वर्ष सन २०१६-१७ या वर्षातील महाराष्ट्र राज्य वीज मंडळाकडून मिळणारी भाडेपट्टीची या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम | रु.९८,६८,६११/- | ०८०१ वीज, (२२) इतर जमा रकमा, (२२)(०१) इतर जमा रकमा - महाराष्ट्र राज्य वीज मंडळा कडून मिळणारी भाडेपट्टीची रक्कम |
| | एकूण | रु.९८,६८,६११/- | |

५. सदर रकमेचे पुस्तकी समायोजन, महालेखापाल मुंबई यांचे अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्याने या रकमेचे देयक तयार करण्यात येऊन नये. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१ यांनी त्यांच्या अखत्यारीत व अधिकारात रु.९८,६८,६११/- (रुपये अठ्याण्णव लाख अडुसष्ठ हजार सहाशे अकरा फक्त) चे पुस्तकी समायोजन करुन शासनास तसे कळवावे.

६. हा शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र १०३/१४६१,दिनांक ३०/०३/२०१७ नुसार दिलेल्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११५/२०१७ - व्यय-१६,दिनांक ३१/०३/२०१७ मधील मंजूरीस अनुसरुन निर्गमीत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र २०१७०३३१२११४०६९९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas Mahadeorao Rajurkar

Digitally signed by Vilas Mahadeorao Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry, Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=83469494bac86099a320f3e14bf8421ee9d2b48e344470b76ea2595df04951b4, serialNumber=02c5c00269dd48836be0d9939bdff848a9ff1f1a9fd195baf3a104d09b0817d9, cn=Vilas Mahadeorao Rajurkar
Date: 2017.04.01 02:07:10 +05'30'

**(वि.म.राजुरकर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत:-**

1. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१

२) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.

३) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.

५) अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१), मुंबई.

६) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.

७) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.

८) अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.

९) विशेष कार्य अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

१०) क.अ.अधिकारी (प्रशा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.

११) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.

१२) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग,ऊर्जावकामगारविभाग,सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, कर मार्ग रामकृष्ण चेंबूर, ३ रा मजला, चेंबुर, (पूर्व), मुंबई-४०००७१.

१३) मुख्य अभियंता (विद्युत) जल विद्युत प्रकल्प, मुंबई ४००००१

१४) कक्ष अधिकारी(ज.वि) जल संपदा विभाग,मंत्रालय मुंबई.

१५) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२